भगवंताने आपल्या भक्तांच्या कल्याणासाठी ज्या नऊ नारायणांना मृत्युलोकात नाथपंथाच्या माध्यमातून पाठविले, त्यांच्या कारकिर्दीची रसाळ कथा किती रंगतदार आणि अतर्क्य अशा घटनांनी परिपूर्ण होती याची जाणीव आपल्याला होते. साक्षात सूर्यतेजापासून उत्पन्न झालेल्या भर्तरीनाथ म्हणजे द्रुमिल नारायण याला कोणकोणत्या दिव्याला सामोरे जावे लागले याची साद्यंत आणि रोमहर्षक कहाणी वाचून, ऐकून वाचक आणि श्रोते कृतकृत्यही झाले. श्रीदत्तगुरूंच्या आदेशावरून गोरक्षनाथांनी अत्यंत चातुर्याने प्रापंचिक पाशातून, भवसागरात गटांगळ्या खात असलेल्या भर्तरीला मुक्त केले आणि गिरनार पर्वतावरील श्रीदत्त आश्रमात आणले. श्रीदात्त्गुरूंनी गोराक्षनाथांचे कौतुक केले आणि भर्तरीला दिलासा दिला की तुझा प्रवास योग्य मार्गावरून होण्यासाठी तुला क्लेश भोगावे लागले. आता पुढील कथासार...

गोरक्षनाथ तीन रात्री श्रीदत्त आश्रमात मुक्कामी होते आणि मग श्रीदत्तांचा निरोप घेऊन मच्छिंद्रनाथांच्या भेटीसाठी निघाले. त्यावेळी श्रीदत्तगुरू म्हणले, “वत्सा गोरक्षा! खूप दिवसात मच्छिंद्र मला भेटलेला नाही, त्याच्या भेटीसाठी माझे नेत्र आसुसलेले आहेत, तरी त्याला घेऊन यावे.” “अवश्य गुरुदेव! मी त्यांना आपल्या भेटीसाठी घेऊन येईन.” असे म्हणून गोरक्षनाथ श्रीदत्तांना वंदन करून निघाले. गिरनार पर्वतावरील श्रीदत्त आश्रमामध्ये श्रीदत्तगुरूंनी भर्तरीला नाथ दीक्षा दिली. मस्तकावर वरदहस्त ठेवून, जोपर्यंत पृथ्वी आहे, तोपर्यंत अक्षय चिरंजीव केला. आशीर्वाद देऊन त्याच्या विद्याभ्यासाला सुरवात केली. ज्योतिष्य, व्याकरण, धनुर्वेध, जलतरण, संगीत, वैधक, अश्वारोहण इत्यादी शास्त्रांत तो पारंगत होताच. गुरुदेवांनी त्याला ब्रम्हज्ञान, रसायन, काव्य, वेद आदी शास्त्रांबरोबरच कोकशास्त्र, नाट्य, कला आदी शास्त्र, भाषाविज्ञान, पातंजल योग दर्शन, मिमांसा दर्शनादी सर्व शास्त्रांत प्रवीण केले. याशिवाय वैधक शास्त्राचे सखोल ज्ञान दिले. वातास्त्र, मेघास्त्र, अग्निअस्त्र, कामास्त्र, धुम्रास्त्र, वाताकर्षण अस्त्र, वज्रास्त्र, पर्वतास्त्र, वासवास्त्र, नागास्त्र, खंगेंद्रास्त्र, ब्रम्हास्त्र, देवास्त्र, काळास्त्र, मोहनास्त्र, रुद्रास्त्र, विरक्तास्त्र, निर्वाणास्त्र, दानवास्त्र, स्तवनास्त्र, कार्तिकास्त्र, स्पर्शास्त्र, विभक्तास्त्र, मानवास्त्र, कामिनीअस्त्र इत्यादी अगणित अस्त्र विद्या शिकवल्या. शस्त्र विद्येत तर तो निपुण होताच. त्रिशूल, फरश, अंकुश, भाला, बरची, तोमर, धनुष्यबाण, मुद्गल, मंडूक, चक्रें, गदा, दारूकायंत्रे, कुठार, तलवार, इत्यादी असंख्य शस्त्रे चालविण्यात तो वाकबगार होताच पण गुरु मुखाने अस्त्र विद्या लाभली आणि दुधात साखर पडली. असामान्य सामर्थ्य प्राप्त झाले. मुळच्या शुद्ध सोन्याच्या कोंदणामध्ये विद्यारत्नांचा लखलखाट झाला. सुगंधी चंदनवृक्षांच्या वनात कस्तुरी मृगांची वस्ती झाल्यावर त्या मिश्रगंधाचे शब्दात वर्णन करणे अशक्य आहे. विद्याविभूषित करून भर्तरीला साबरी कवित्व करावयास लावले. मार्तंड पर्वतावरील नाग अश्वत्थस्थानी भर्तरीला रवाना केले. सुर्यकुंडामधील पाण्याने जसा मच्छिंद्रनाथांनी सिंचनविधी केला होता, तो करून सर्व देवतांना प्रसन्न करून वरदान मिळवले. मग श्रीदत्तगुरूंनी त्यांना बद्रिकाश्रम अरण्यात तपश्चर्येसाठी बसविले आणि स्वतः गिरनार आश्रमात येऊन मच्छिंद्र भेटीची प्रतीक्षा करू लागले.

गोरक्षनाथ श्रीदत्तगुरूंचा निरोप घेऊन निघाले आणि गर्भाद्री पर्वतावरील मच्छिंद्रनाथांच्या आश्रमात आले. गुरु चरणांवर मस्तक ठेवून वंदन केले. त्यांनी श्रीदत्तगुरूंचा निरोप सांगितला, “गुरुदेव, आपल्या भेटीसाठी श्री दत्तगुरू अधीर होऊन वाट पाहत आहेत. आपल्या आगमनाकडे ते डोळे लावून बसले आहेत. तरी त्यांना भेटून प्रेमाच्या लहरींने त्यांचा मनाचा सागर संतुष्ट करावा. सोमवेलीला चंद्राचे आकर्षण असते त्याप्रमाणेच श्रीदत्तात्रेय आपल्या भेटीसाठी उत्सुक होऊन वाट

पाहत आहेत," शिष्योत्तम गोरक्षाची वाणी ऐकून मच्छिंद्रनाथसुद्धा श्रीदत्तगुरूंच्या भेटीसाठी अधीर झाले आणि म्हणाले, "पुत्रा गोरक्षा, दत्तमाउलींच्या भेटीसाठी मी सुद्धा व्याकूळ झालो आहे." काही दिवसांनी मच्छिंद्र आणि गोरक्ष, श्रीदत्तगुरूंच्या भेटीसाठी निघाले. विदर्भ देशाचा मार्ग धरून वाटचाल करीत असताना ते कौंडीप्यपुरी नगरीत आले. भिक्षा मागण्यासाठी भटकंती करीत असताना तेथील राजा, शशांगर याने रागाच्या उन्मादात स्वतःच्या मुलाचे हात पाय तोडून त्याला चौकात उघड्यावर टाकून दिल्याचे दृश्य पाहिले. त्या राजाने एवढी क्रूर शिक्षा कोणत्या अपराधासाठी केली याची हकीगत त्यांना समजली ती अशी...

कौंडीप्यपुर नगरीचा राजा शशांगर मोठा कर्तव्यदक्ष, ज्ञानी, धार्मिक, उदार आणि शूरवीर होता. सर्व सुखे हात जोडून उभी होती पण तो निपुत्रिक होता. पोटी संतती नाही या कलंकाने राजाचे चित्त उद्‌विग्न होऊन राजवैभवांचा उपभोग घेण्यास त्याचे मन रमत नव्हते. अन्नपाणीही त्याला गोड वाटत नसे, आसन, वसन, शयन यांकडे त्याचे दुर्लक्ष होत असे. गायन, वादन, मनोरंजन, कलाकुसर कशातच रुची राहिली नव्हती. राजा सतत एकांतात बसून कुलदिपकासाठी चिंता व्यक्त करीत स्वतःला क्लेश करवून घेत असे. या ध्यासाने पछाडलेल्या राजास एके दिवशी महाराणी मंदाकिनी समजावू लागली. "नरेंद्रोत्तम महाराज! आपण अहोरात्र संतती प्राप्तीसत्व ध्यास करीत राहता, परंतु भाग्यात नसेल तर काय करावे? कपाळावर लिहिलेल्या विधीलिखितापुढे कुणाचे काय चालणार? तरी व्यर्थ चिंता करून अविचारीपणाने देहाला कष्ट देऊ नका. चित्त स्थिर ठेवावे. मृत देहाला चिता जळते परंतु चिंता ही जिवंतपणीच देह जाळीत असते. चिंता क्लेशाने विवेक बुद्धीचा ऱ्हास होतो. बुद्धिहीन अविचाराने संसार ओस पडतो. तरी जागे व्हावे." महाराणीच्या उपदेशाचा काहीही उपयोग झाला नाही, कुलदिपकाचा ध्यास त्यांच्या मनातून जात नव्हता दिवसेंदिवस त्यांना चिंता जाळीत होती. एके दिवशी राजा खूपच उद्‌विग्न झाला आणि संकाटापासून सुटका करणाऱ्या श्री शिवाची आराधना करून त्यांना तृष्ट करण्याचा दृढ निश्चय केला. मंत्रीगणांची सभा बोलवून, राज्यकारभार त्यांच्या हाती सोपविला आणि खाजगी सेवकांसह राजा दक्षिण दिशेने निघाला. रामेश्वरक्षेत्री श्रीशिवाची उपासना करून त्यांना प्रसन्न करावे असा शशांगर राजाचा मनोदय होता. रामेश्वरच्या दिशेने वाटचाल करीत असताना कृष्णा तुंगभद्रेच्या संगमावर रात्री वस्तीस राहिला. मध्यरात्रीनंतर स्वप्नामध्ये सांब सदाशिव दशकर पंचान्नाच्या रुपात आले आणि म्हणाले, "राजा! याच ठिकाणी तुझी मनोकामना पूर्ण होईल. तुझ्या कुळाला कुलदीपक लाभेल. कृष्णा तुंगभद्रा नद्यांच्या संगमाजवळील त्रिकोणी चीमट्यात (त्रिभुज प्रदेशात) अपर्णेसह माझी लिंगरुपात मूर्ती आहे, त्या मूर्तीची तू नित्य आराधना कर. त्या उपासनेची फलश्रुती म्हणजे तुला संतानप्राप्ती होऊन मनोकामनेची पूर्तता होईल या व्यतिरिक्त अन्य मार्ग नसल्याने हीच एकमेव साधना तू कर." स्वप्नदृष्टांताने राजा खडबडून जागा झाला.

पाहटे सूर्योदयासमयी स्वप्नात दर्शविलेल्या त्रिभुज भूमीत राजाने शोधाशोध केली असता, तिथे त्याला एक पुरातन शिवलिंग आणि पार्वतीची मूर्ती सापडली. हे लिंग दुर्लक्षित आणि प्राणप्रतिष्ठा न झालेले होते. राजाने मनोभावे दर्शन घेऊन त्याची विधिवत प्राणप्रतिष्ठा करून पूजा केली. नित्य पूजाविधी करण्यासाठी पुजाऱ्याची नेमणूक केली. राजामुळे निर्माण झालेल्या पाऊल वाटेचा राजमार्ग झाला आणि असंख्य भाविक दर्शनासाठी तिथे येऊ लागले. 'हर हर महादेव!' असा अखंड जयघोष होऊ लागला. राजाने मोठा उत्सव करून 'संगमेश्वर' महादेवाचे टोलेजंग शिवमंदिर उभारले. 'ॐ नमःशिवाय' या मंत्रोच्चाराने वातावरण मंगलमय झाले. शशांगर राजा तिथेच राहून शिवलिंगाची अर्चना करू लागला. रामेश्वरला आपण जाणार होतो पण येथेच आपणास रामेश्वर भेटला अशी श्रद्धा ठेवून आराधना करू लागला.

कृष्णा आणि तुंगभद्रा या दोन्ही नद्यांच्या मधल्या भूमीत संगमेश्वर मंदिर वसले, ते शशांगर राजाला झालेल्या दृष्टांतामुळेच. याच संगमेश्वराजवळच्या एका छोट्याशा खेडेगावात मित्राचार्य नावाचा एक विद्वान ब्राह्मण रहात होता, त्याची पत्नी शरयु एक पतिव्रता स्त्री होती. या उभयतांनाही संतानसुख नव्हते. त्यामुळे हे पतीपत्नीही दुःखी होते. मित्राचार्य आणि शरयु हे सुद्धा संतान प्राप्तीसाठी संगमेश्वराची आराधना करू लागले होते. असे अनेक दिवस उलटून गेले.

कैलासावर शिवधामांत कैलासनाथ श्रीशंकर, शिवगणांच्या सभेत विराजमान झाले आहेत. वैडूर्य रत्नाच्या तेजाप्रमाणे चमचम करणाऱ्या या कैलास धामात, सभा मनोरंजनासाठी सुरोचना अप्सरेला नृत्य करण्यासाठी निमंत्रित करण्यात आले. देवांगना सुरोचनाने सभामंडपात येऊन श्री शिवाला वंदन करून नृत्यगायनास आरंभ केला. संगीताच्या सुरांनी शिवसभा तल्लीन झाली होती. नृत्य करीत असलेल्या सुरोचनाच्या मनात श्रीशंकराबरोबर रत होऊन काम भावना शांत करण्याची भावना निर्माण झाली. देहात कामवासना चेतवल्यामुळे नृत्यातील लक्ष विचलित झाले आणि पदन्यास अडखळू लागले. तिचे चाचरणे पाहून श्रीशिवाच्या लक्षात सर्व प्रकार आला. ते मनात विचार करू लागले, “ही कामिनी वासनेने पेटली आहे, हे सर्वथैव अयोग्य आहे.” त्यांनी तिला नृत्य थांबविण्यास सांगून म्हणाले, “अप्सरा सुरोचना, तुझ्या मनातील माझ्या विषयीची अभिलाषा मला समजली आहे. माझ्याकडून कामपुर्तीची अपेक्षा धरल्यामुळे तुला मृत्युलोकात पाठविण्यात येत आहे. कृष्णा तुंगभद्रा नदीच्या संगमाजवळील गावात मित्राचार्य आणि शरयु या दांपत्याच्या पोटी तुझा जन्म मानव कन्येच्या रूपांत होईल.” श्रीशिवाची ही शापवाणी ऐकून सुरोचना भयभीत झाली. खिन्न मनाने विचार करू लागली. “दुर्दैवाने नको ते विचार मनात आले आणि मी स्वर्गातून मृत्यु लोकात आले. श्रीशिवाबरोबर रतीक्रीडा करण्याची कामना मनाला मोठी गोड वाटत होती परंतु तेथे दुर्दैवरुपी खवीस प्रकट होऊन नुकसान करून गेला. आता काय करावे? मन एक इच्छिते आणि प्रारब्ध दुसरेच काही घडवते. माणिक मोत्यांची इच्छा व्यक्त केली आणि काचेचा मणी मिळाला.” अत्यंत नैराश्याने आणि उदास चेहऱ्याने तिने शिवाची स्तुती आरंभली. “हे महाराजा कैलासपती! नंदीवहना, त्रिशूलधारका, सर्वांगी विभूतीलेपना आपण तर व्यक्ताव्यक्त आहात. फरश, अंकुश, गदा, तोमर, डमरू, चक्र, कपालगात्र, रुंड, मुंड भूषणे आपल्या दहा हातांत शोभत आहेत. माथ्यावर अर्धचंद्र, जटाभरात शुभ्र गंगा धरणकर्त्या श्री शिवा आपणास पर्वत माथ्यांवरील बर्फाच्छादित एकांत योगसाधनेसाठी प्रिय आहे. तरी हे उमारुपी मायेच्या भ्रतारा महादेवा, आपण देवांचेही श्रेष्ठ देव असल्याने आपणास महादेव संबोधले जाते. हे भोळया शिवशंकरा, माझ्याकडून चूक झाली असल्याने दयाळूपणे माझी चूक पदरात घेऊन माझी व्यथा दूर करा. दया करा, संकटातून सुटण्यासाठी काहीतरी उःशाप द्यावा.” या प्रार्थनेवर भोला सांब प्रसन्न होऊन म्हणाले, “तू मृत्युलोकात जाशील हे अटळ आहे. तरीही, तू माझी आराधना केल्यास मी प्रत्यक्ष प्रकट होऊन तुला स्पर्श करीन. त्या स्पर्शाने तू शापमुक्त होशील आणि स्वस्थानी परतशील.” हे ऐकताच अप्सरा महादेवांना वंदन करून निघून गेली.

मित्राचार्यांची भार्या शरयुच्या उदरात देवांगना सुरोचनाने जन्म घेतला. शरयुला नऊ महिने नऊ दिवसानंतर कमळाच्या फुलासारखी गोजिरवाणी कन्या जन्माला आली. पूर्वजन्माची ती लावण्यवती अप्सरा असल्याने तिच्या सौंदर्याचे शब्द वर्णन करणे केवळ अशक्य! सुवर्णासारखा तेजस्वी वर्ण, फुलांच्या पाकळयांसारखी कोमल त्वचा, चंद्रासारखा तेजस्वी रेखीव चेहरा, पाणीदार टपोरे नेत्र, काळेभोर कुरळे केस, मोत्यासारख्या दंतपंक्ती, लालचुटूक ओठांमध्ये लोभसवाणे हास्य, सरळ धारदार नासिका, तिचे सौंदर्य पाहून मदनालाही मूर्च्छना यावी. चंपक, मालतीच्या सुगंधी फुलासारखी,

कस्तुरी गंधाप्रमाणे सुगंधी भासणारी ती गजगामिनी कन्या दिवसेंदिवस मोठी होत बारा वर्षांची किशोरी झाली. 'कंदबा' हे सार्थ नाव तिला शोभून दिसत होते.. माता पित्यांबरोबर ती नित्यनियमाने शिवमंदिरात जाऊन आराधना करीत असे. जन्मदात्यांनी तिच्या विवाहाचा बेत आखला असतां त्या इंद्रियदमनी कन्येने नम्रपणे नकार दिला. ती पूर्णपणे विरक्त वृत्तीची होती. सदा सर्वकाळ शिवाची आराधना करण्यास तिला गोडी वाटत असे. अष्टौप्रहर शिवध्यान करीत राही. जाणत्या वयाची झाल्यानंतर ती शिव मंदिरात स्वतः जाऊन पूजा करीत असायची. अशाच एका शुभ दिवशी ती एकटीच शिवालयात गेली होती.

शिवलिंगाची पूजा करून ती ध्यानस्त बसली होती. त्यावेळी श्री शिव तिथे गुप्त रूपांत बसले होते. तिचे अप्रतिम लावण्य पाहून ते मोहित झाले. आज हिची मनोकामना पूर्ण करावी, अशा विचारांनी ते शिवलिंगातून प्रकट झाले. गाभाऱ्यात तेज प्रकट झालेले पाहून ती ध्यानातून जागी झाली आणि घाबरून शिवाल्याबाहेर पळत सुटली. तिला पकडण्यासाठी शिव धावले. पुढे कंदबा पळत आहे आणि मागे कामातुर होऊन श्रीशिव तिचा पाठलाग करीत आहेत. त्यांनी तिला गाठून तिच्या हातास धरले, त्याच क्षणी मानवी देहाचा त्याग करून मूळ अप्सरेच्या रूपातील सुरोचना शापमोचन झाल्याने स्वर्गात गेली. कामातुर शिवाच्या कामभावना अनावर होऊन इंद्रियामार्गे द्रव बाहेर सांडला. कृष्णा नदीच्या पात्रात ते महातेज पडून प्रवाहात वाहू लागले. योगायोगाने शशांगर राजा नेमका त्याच वेळी नदीच्या खालच्या किनाऱ्यावर स्नानासाठी आला होता.

शशांगर राजा स्नान उरकून सूर्याला अर्घ्य देण्यासाठी नदीपात्रात उभा होता. त्याने पाण्याची ओंजळ भरून घेतली असता त्यात पाण्याबरोबर वाहत असलेले शिवतेज आले. मानवी देहाचा स्पर्श होताच, त्या वीर्यबीजापासून दैदीप्यमान बालक उत्पन्न होऊन अलगदपणे राजाच्या हातात आला. अत्यांतिक विस्मयाने हर्षनिर्भर अवस्थेत राजा उद्गारला, "अहो आश्चर्यम्! मला श्रीशिवसंभो प्रसन्न झाले. अयोनीसंभव पुत्र लाभला. हा बालक नक्कीच ब्रह्मा, विष्णू, महेश, बृहस्पती, इंद्र अथवा सूर्य अशांपैकी कुणीतरी अवतारी असावा. धन्य, धन्य शिव शंकरा! तुझे मजवर अनंत उपकार झाले." बाळाला छातीशी धरून राजा मुक्कामी आला. पतिव्रता पत्नी मंदाकिनीच्या ओटीत बाळला ठेवले. त्या गोड, गोजिरवाण्या बाळाला पाहून तिने आनंदाने विचारले, "स्वामी, एवढे गोमटे बाळ कुणाचे आहे? शशांगर म्हणाला, "महाराणी! आज नवल घडले. कृष्णा पात्रात उभे राहून सूर्याला अर्घ्य देत असतांनाच हे बाळ ओंजळीत प्रकट झाले. संगमेश्वराच्या कृपेनेच आपणांस दिव्य पुत्रलाभ झाला. तुझे वांझपण संपले आहे. अलौकिक पुत्राची माता म्हणून आता तू ओळखली जाशील. तू माता आणि मी पिता झालो. मंदाकिनी! महादेवाने आपली मनोकामना पूर्ण केली. माथ्यावरचा कलंक गेला. आपले जीवन कृतार्थ झाले."

पतीचे बोलणे ऐकून तिला परम हर्ष झाला. पुत्र वात्सल्याने तिच्या स्तनात दुधाचा पान्हा फुटला. बाळाच्या मुखात स्तनाग्र घालताच बाळ चुरुंचुरुं दुध ओढू लागले. कृष्णा नदीच्या पात्रात निपजला म्हणून बाळाचे नाव 'कृष्णागर' ठेवण्यात आले. दशकर पंचानन म्हणजेच दहा हात आणि पाच मुखे असलेल्या शंभू महादेवाचे भाकीत खरे ठरले. मनोकामना पूर्ण झाल्याने काही दिवसांनी राजा शशांगर आणि राणी मंदाकिनी कौंडीप्यपुरीस परत येऊन राज्य करू लागले.

निसर्गनियमानुसार आणि कालचक्रगती अन्वये राजपुत्र कृष्णागर दहा वर्षाचा झाला. त्याचा विवाह करण्याच्या उद्धेशाने राजा शशांगराने वधु शोधास आरंभ केला. मंत्री आणि पुरोहित यांना आज्ञा केली, “राजपुत्र कृष्णागरासाठी अनुरूप अशी कुमारी पहावी. सुलक्षणी, रूपवान, गुणवान अशी सर्वार्थाने राजपुत्राची आणि तिची जोडी जमली पाहिजे, याची दक्षता घेऊन कन्येची निवड करावी.” अशी अपेक्षा आणि सूचना राजाकडून व्यक्त करण्यात आली. “जशी आज्ञा महाराज!” असे म्हणून मंत्री आणि पुरोहित वधू संशोधन मोहिमेवर निघाले.

अनेक राज्ये, अनेक देशांची भ्रमंती या मंडळींनी केली पण राजपुत्राला साजेशी एकही वधू मिळेना. कुणाचे रूप तर कुणाचे गुण गौण ठरायचे. राजपुत्र इतका रूपवान होता की त्याला त्याच्या तोडीची जोडीदारीण मिळणे दुरापास्त झाले. मंत्री आणि पुरोहित भ्रमंती करून थकले परंतु सर्वगुणसंपन्न कन्या काही भेटली नाही. थकून नाईलाजास्तव परत येऊन राजाला सांगू लागले, “महाराज! दोन वर्षापेक्षा जास्त काळ भ्रमण केले. अपरिमित कन्या पहिल्या, तथापि राजकुमाराला साजेशी एकही कन्या सापडली नाही.”

या घटनेस सहा महीन्याचा कालावधी झाल्यानंतर राणी मंदाकिनीचे अचानक निधन झाले. शशांगर राजा फारच दुःखी झाला. जीवनसाथी, अर्धांगीनीच्या वियोगाने विव्हल झाला. मृत्यूला काही पर्याय नसतो. ती अटळ घटना असते पण कुणाच्याही मृत्यूने जगरहाटीत काही बदल होत नसतो, की मृताच्या मागे कुणीही जात नसतो, या न्यायाने राजाने सुतक संपल्यानंतर कर्तव्यभावनेने पुन्हा राज्यकारभार सुरु केला. या गोष्टीलाही एक वर्ष उलटले. मंदाकिनीचे वर्षश्राद्ध झाले. पत्नीविना एकाकीपणा राजा शशांगराला खायला उठत होता. कशातच लक्ष लागत नसे. विमनस्कता असली तरी मनात व्यभिचाराचा विचार कधीही आला नाही. परंतु आयुष्याला जोडीदार पाहिजे या विचाराने त्यांनी मंत्र्यांना बोलाविले. “मकरंदा! तू देशोदेशीच्या कन्या पाहून आलेला आहेस, त्यांपैकी राजकुमारासाठी कुणी अनुरूप नसली तरी आम्हाला साजेशी कोणी उपवर कन्या पाहण्यात आले आहे काय?” त्यावर “होय महाराज!” असा होकार मंकरंदाने राजास दिला. “पुरोहिताकडे लिखित टिपणे आहेत. ती अवलोकन करून आपली पसंती सांगावी त्या अनुषंगाने पुरोहितांसह, मंत्री आणि राजा यांनी एकत्रपणे विचारविनिमय करून चित्रकुट राज्याच्या राजा भूजध्वज यांची कन्या भुजावंतीची निवड केली. मंत्र्यासमवेत भूजध्वजाला खलिता पाठविण्यात आला. उभयपक्षी मान्यतेने विवाह ठरुन एका शुभ मुहूर्तावर पार पडला. कौंडीप्यपुर राजनगरीत पुन्हा एकदा राजलक्ष्मी वावरू लागली. त्यावेळी भुजावंती तेरा वर्षांची आणि राजपुत्र कृष्णागर सतरा वर्षांचा होता. भुजावंती नेहमीच अंतःपुरात असायची राज्य कारभाराशी तिचा फारसा संबंध येत नसल्याने बाहेर वावर नसे. तिला सवतीपुत्रबद्दल केवळ ऐकीव माहिती होती. परंतु दोघांची एकमेकांशी प्रत्यक्ष भेट घडली नसल्याने परिचय नव्हता.

एकदा शशांगर राजा शिकारीसाठी गेला असताना एक अनिष्ट घटना घडली. राजपुत्र कृष्णागर मोकळया जागी पतंग उडविण्याच्या खेळांत रमून गेला होता. त्यावेळी भुजावंती माडीच्या सज्जात आली असतां तिची नजर राजपुत्रावर पडली. त्याचे ते कामदेवासारखे देखणे रूप पाहून ती कामविव्हळ झाली. तिने दासीला बोलावून आज्ञा केली, “तो तिकडे पतंग उडविणाऱ्या तरुणाला आज्ञा करून बोलावून आण.” दासीने राजपुत्राजवळ जाऊन सांगितले. “राजकुमार, आपणास माता भुजावंतीने महालात पाचारण केले आहे.” हा निरोप ऐकून, “अवश्य, मातेची आज्ञा पालन करणे माझे कर्तव्य आहे.” असे म्हणत त्याने पतंग आणि धाग्याचे चक्र सेवाकाजवळ दिले आणि दमदार पावले टाकीत महालाकडे निघाला मनात

विचारमंथन सुरु होते. “महाराज तातश्री विवाह करून आले तेव्हा फक्त एकदाच मातोश्रींचे दर्शन घडले होते. त्याला पुष्कळ दिवस झाले. आज सुदिन उगविला आणि मातेने स्वतःहून भेटीची आज्ञा केली. आज माझ्या नशिबाचा उदय झाला म्हणायचा. मातेच्या ममतेचे छत्र लाभणे ही परमेश्वरी कृपाच आहे.” अशा विचारांच्या तंद्रीत कृष्णागर महालात येऊन पोहोचला.

भुजावंतीने कृष्णागर येत आहे हे माडीवरून पहिले होते. महालातील शयनगृहाच्या दारात येऊन ती उभी राहून त्याची प्रतीक्षा करीत होती. अधीर झाली होती. दासीने दुरूनच अंगुलीनिर्देश करून त्याला धाडला आणि स्वतः निघून गेली. कृष्णागराने भुजावंती समोर जाऊन त्रिवार मुजरा केला. तिने खस्सकन् त्याचा हात धरून त्यास आंत ओढले. भावनावेगाने गच्च मिठी मारून वासना शांत करण्याची विनवणी करू लागली. तिची ही कृती पाहून आणि इच्छा ऐकून तो थरारलाच, कोपित होऊन म्हणाला, “अहो! आपण माझ्या सापत्न माता आहात, याचा आपणास विसर पडला काय? मानवी नात्यांची सभ्यता सोडून असे वागणे पशुवत आहे. असल्या कोत्या दुर्बुद्धीचे पाप कुठे फेडणार? कामासक्त स्त्री खरोखर अमंगळ, चांडाळणीपेक्षाही हीन, आणि पापाचरण वाढविणारी असते. धिक्कार असो अशा वर्तनाचा.” तिचा हात झटक्यात हिसडून तो बाहेर निघून गेला आणि क्षणापूर्वी काय झाले ते विसरून तो पतंग उडविण्याच्या खेळात पुन्हा रामबाण झाला.

तो तरूण म्हणजे आपला सावत्र पुत्र आहे, हे भूजावंतीला माहित नव्हते. ती फार घाबरली. खास विश्वासू दासीला बोलावून सांगू लागली, “फारच भयंकर प्रकार घडला आहे गं बाई! अगं तो परपुरुष नव्हता, सापत्न पुत्र होता, त्याच्याकडे अजाणतेपणे मी कामपुर्तीची मागणी केली. आता ही गोष्ट तो महाराजांना सांगेल आणि कुलटा म्हणून राजा माझा शिरच्छेद करेल. दुष्कीर्ती होऊन मरण्यापेक्षा आताच विष प्राशन करून प्राण त्याग करणे हिताचे होईल. जिवंत राहून क्लेश भोगण्यापेक्षा मृत्यूच अधिक श्रेयस्कर वाटतो? भुजावंतीच्या या समस्येवर दासीने काय शक्कल काढली ते पुढील अध्यायात जाणून घेऊया.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने चोरांची दृष्टी नाहीशी होईल.